वितरण आदेश क्र. १

समायोज्य अनुदान

अर्थसंकल्पीय अनुदान २०११-१२

२०४९-व्याज प्रदाने-१०८ विमा व निवृत्ती वेतनावरील व्याज (मागणी क्र.एल- १) (राज्यक्षेत्र) (भारित)

---

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय क्रमांक बीजीटी- २०११/सीआर- ४४/वित्त-१

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २८ एप्रिल, २०११.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासनाने जिल्हा परिषद कर्मचा-यांना दिनांक १ ऑक्टोबर १९९० पासून गट विमा योजना लागू केली आहे. या योजनेंतर्गत जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या जमा होणा-या रकमेवर व्याज तसेच ज्या कर्मचा-यांचे सेवेत असतांना निधन झाले आहे, त्यांच्या कुटुंबियांना नुकसानभरपाईची रक्कम देण्यांसाठी सन २०११-१२ या आर्थिक वर्षासाठी विमा निधीसाठी रु. १,६२,२१,०००/- व बचत निधीसाठी रु. ३४,९५,२८,०००/- अशी एकूण रु.३६,५७,४९,०००/- (रुपये छत्तीस कोटी सत्तावन्न लक्ष एकोणपन्नास हजार फक्त ) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे.

२. सन २०११-१२ च्या संपूर्ण अर्थसंकल्पीय तरतूदीस मंजूरी मिळेपर्यंत सन २०११-१२ या वित्तीय वर्षाच्या पहिल्या दोन महिन्याच्या कालावधीतील स्थायी खर्चासाठी व अंमलबजावणीखालील योजना पुढे चालू ठेवण्याकरिता लागणारा खर्च भागविण्यासाठी विधानमंडळाने "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक २०११ मंजूर केले असून ते महाराष्ट्र अधिनियम क्र.५ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४ दि.३१ मार्च, २०११ मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

३. त्यानुसार आता संचालक, लेखा व कोषागारे यांना सन २०११-१२ या आर्थिक वर्षाकरिता जिल्हा परिषद कर्मचा-यांना विमा निधी व बचत निधी यावरील व्याज देण्यासाठी एप्रिल ते जून २०१० या महिन्यांसाठी पुढील तक्त्यात रकाना क्र.३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे रु. ९,१४,३७,०००/- (रुपये नऊ कोटी चौदा लक्ष सदतीस हजार फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यात येत आहे. सदर अनुदान संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई यांच्या क्र. ७१०१००३२६९ या DDO code वर अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर दर्शविण्यात येत आहे.

( रु. हजारांत)

| अ.क्र. | उपलेखाशिर्ष | आता या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत असलेले अनुदान |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | अ) विमा निधी (२०४९११४१) | ४०५५ |
| २ | ब) बचत निधी (२०४९११५२) | ८७३८२ |
| | एकूण.... | ९१४३७ |

४. उपरोक्त तक्त्यात स्तंभ ६ मध्ये दर्शविलेल्या रकमा संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे विमा निधी व बचत निधीवरील व्याजाच्या पुस्तकी समायोजनासाठी सुपूर्द करण्यांत यावी. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी संचालकाकडून प्राप्त झालेल्या देयकावर आवश्यक ती कार्यवाही करुन उपरोक्त रकमेचे समायोजन करावे.

५. हा खर्च "२०४९-व्याज प्रदाने -१०८ विमा व निवृत्ती वेतन निधी यावरील व्याज (१) राज्य शासकीय जिल्हा परिषद कर्मचारी गट विमा योजना (०१) (०१) विमा निधी (२०४९११४१) (०१) (०२) बचत निधी (२०४९११५२) (मागणी क्रमांक एल-१)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन सन २०११-१२ या आर्थिक वर्षासाठी केलेल्या तरतूदीतून भागविण्यांत यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( प्र. म. महाजन )
कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१ मुंबई ( लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) (५ जादा प्रतीसह)
२. महालेखापाल,महाराष्ट्र-२. नागपूर( लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) (५ जादा प्रतीसह
३. सर्व विभागीय आयुक्त, (विकास शाखा)
४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
५.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६.अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७.वित्त विभाग (बीयुडी २)
८.का.क्र. आस्था-५,आस्था-११, वित्त-७ व वित्त-८ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
९.निवड नस्ती का.क्र.वित्त-१